शासनातर्फे विविध न्यायालयांत खटल्यामध्ये नियुक्त करण्यांत आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांची / विशेष समुपदेशी यांची प्रलंबित व्यावसायिक शुल्क अदा करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
गृह विभाग
शासन निर्णय क्र. पीआरओ २००४/प्र.क्र. ७६/पोल-१०,
मंत्रालय, मुंबई-३२, दि. २६ ऑगस्ट, २००४.

वाचा :- १. अप्पर पोलीस आयुक्त (गुन्हे), बृहन्मुंबई यांचे पत्र क्र. १३१६/ अपोआ (गुन्हे)/ २००४, दि. १७.६.२००४.
२. अवर सचिव, गृह विभाग यांचे पत्र क्र. एसयुपी ११०३/पु.मा./ जून-२००४/बीयुडी-१, दि. २.७.२००४.

**शासन निर्णय** :- बृहन्मुंबई पोलीस दल, गुन्हे शाखा, मुंबई यांचेशी तसेच राज्य शासनाशी संबंधित विविध खटल्यामध्ये नियुक्त करण्यात आलेल्या विशेष सरकारी अभियोक्त्यांचे तसेच विशेष समुपदेशी यांचे प्रलंबित व्यावसायिक शुल्क अदा करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदरहू व्यावसायिक शुल्क अदा करण्याकरिता विधानमंडळाच्या जून २००४ च्या अधिवेशनात रु. ४६.७१ लाख (रुपये सेहेचाळीस लाख एकाहत्तर हजार फक्त) पूरक अनुदान मंजूर करण्यात आले आहे. तथापि वित्त विभागाने सध्या तरतूदीच्या ५० % रक्कम वितरित करण्यास परवानगी दिली आहे. त्यानुसार रु. २३.३५ लाख ( रुपये तेवीस लाख पस्तीस हजार फक्त ) इतकी रक्कम या आदेशाद्वारे वितरित करण्यात येत आहे.

२. या प्रकरणी होणारा खर्च मागणी क्र. बी-१ "२०५५-पोलीस १०८, राज्य पोलीस मुख्यालय (०२) शहर पोलीस (०२)(०१) आस्थापना १२, व्यावसायिक शुल्क व विशेष सेवा (२०५५ ०९७)" या लेखाशीर्षाखाली टाकून तो सन २००४-२००५ या वित्तीय वर्षात जून २००४ (अतिरिक्त अर्थसंकल्पीय) अधिवेशनात पूरक मागणीद्वारे मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. सीआर-३८२/०४/व्यय-७, दि. १९.७.२००४ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( क. गो. देशपांडे )
शासनाचे उपसचिव

प्रत,

- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई (पत्राने).
- महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
- अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
- निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
- सह सचिव (विधी) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
- वित्त विभाग (व्यय-७), मंत्रालय, मुंबई.
- गृह विभाग (बियुडी-१), मंत्रालय, मुंबई.
- गृह विभाग (पोल-१०), निवडनस्ती